''आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार '' यांचे पदनाम ''आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास'' असे सुधारीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

रोजगार व स्वयंरोजगार विभाग,
शासन निर्णय क्रमांकःइएसई-२०११/प्र.क्र.२०/प्रशा-२,
नवीन प्रशासकीय भवन, १४ वा मजला,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : ०५ मार्च, २०११.

वाचाः- १) शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग क्रमांक : इएसई-२००१/प्र.क्र.११/रोस्वरो-३, दिनांक २२ जानेवारी, २००१.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : संकिर्ण-१००७/५४६/१८(र.व.का.), दिनांक ०८ सप्टेंबर, २०१०.

**पार्श्वभूमी** :-

संदर्भाधीन अनुक्रमांक २ येथील दिनांक ०८ सप्टेंबर, २०१० च्या शासन निर्णयान्वये सचिव, रोजगार व स्वयंरोजगार हे पद रद्द करुन आणि त्या सचिव पदाचे कामकाज क्षेत्रिय यंत्रणेच्या कामकाजासह सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांच्याकडे सोपविण्यात आले आहे. तसेच, सदर संदर्भाधीन अनुक्रमांक २ येथील दिनांक ०८ सप्टेंबर, २०१० च्या शासन निर्णयाप्रमाणे संचालक, व्यवसाय शिक्षण हे आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार यांच्या पर्यवेक्षकीय नियंत्रणाखाली आणण्यात आले आहे. राष्ट्रीय कौशल्य विकास अभियानाचे शासनाकडील सर्व प्रशासकीय विभाग, कार्पोरेट सेक्टर, उद्योग जगत व स्वयंसेवी संस्था यांचेशी समन्वयाचे काम हे आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार यांच्याकडे देण्याचा उच्च व तंत्रशिक्षण विभागाने निर्णय घेतला आहे. सदर बदल लक्षात घेऊन ''आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार'' यांचे पदनाम ''आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास'' असे सुधारीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार, आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार पदनामात खालीलप्रमाणे बदल करण्याबाबत शासनाने निर्णय घेतलेला आहे.

**निर्णय** :-

''आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार'' यांचेकडे उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील राष्ट्रीय कौशल्य विकास अभियानाच्या समन्वयाचे कामकाज सोपविण्यात आले आहे. यास्तव त्यांचे पदनाम ''आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास'' असे सुधारीत करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१४३२/१२, दिनांक २०/११/२०१० आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.९३/११/व्यय-६, दिनांक ०८/०२/२०११ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०३०५१६५३०३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

स्वा.<br>
(वि.रा.शिरसाट)<br>
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,<br>
मा.राज्यपाल यांचे सचिव,<br>
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,<br>
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,<br>
सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,<br>
सर्व मा. विधान परिषद सदस्य / विधानसभा सदस्य<br>
महालेखापाल - १ / २ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर<br>
मा.मुख्य सचिव यांचे सचिव,<br>
सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,<br>
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,<br>
आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई,<br>
संचालक, व्यवसाय शिक्षण, मुंबई,<br>
रोजगार व स्वयंरोजगार विभागातील सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी,<br>
कक्ष अधिकारी (१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,<br>
कक्ष अधिकारी (व्यय-६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,<br>
सर्व उप संचालक, रोजगार व स्वयंरोजगार, विभागीय मुख्यालये,<br>
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई<br>
लेखापरीक्षाधिकारी, मुंबई<br>
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी<br>
अपर कोषागार अधिकारी, उपकोषागार कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई